जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामध्ये
कार्यरत असलेल्या कंत्राटी महिला
कर्मचाऱ्यांच्या प्रसुती रजेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.३३/पापु-०७

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २० मार्च, २०१५

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः** संकीर्ण-२०१२/प्र.क्र.७२/पापु-०७, दिनांक १ नोव्हेंबर,२०१२

**प्रस्तावना :**

संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) यांच्या संनियंत्रणाखालील संपुर्ण स्वच्छता अभियान कक्ष (TSC) व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांच्या संनियंत्रणाखालील जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष (DWSM Cell) यांचे विलिनीकरण करुन एकीकृत जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाची स्थापना करण्यात आली आहे व यामध्ये कार्यरत असलेल्या सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांचे/सल्लागारांचे समायोजन करण्यात आलेले आहे.

संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये एकीकृत जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामध्ये कार्यरत असलेल्या कंत्राटी कर्मचारी/सल्लागार यांच्या रजेबाबत उल्लेख करण्यात आला असून कंत्राटी स्वरुपातील कर्मचाऱ्यांना १० दिवस नैमित्तीक रजा व १५ दिवस वैद्यकिय रजा अनुज्ञेय करण्यात आलेली आहे. तथापि, या शासन निर्णयामध्ये जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षात कार्यरत असलेल्या कंत्राटी महिला कर्मचाऱ्यांना आवश्यक असलेल्या प्रसुती रजेचा उल्लेख नाही.

राज्यातील जिल्हा परिषदांमधील जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामध्ये कार्यरत असलेल्या अनेक कंत्राटी महिला कर्मचाऱ्यांकडून प्रसुती रजा अनुज्ञेय करण्याची विनंती वारंवार शासनास होत आहे. शासनास प्राप्त होत असलेल्या मागण्या, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या प्रसुती रजा तसेच राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत असलेल्या कंत्राटी महिला कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या प्रसुती रजा या बाबींचा विचार करुन जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामध्ये कार्यरत असलेल्या कंत्राटी महिला कर्मचाऱ्यांकरीता प्रसुती रजा अनुज्ञेय करण्यासाठी धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामध्ये कार्यरत असलेल्या कंत्राटी महिला कर्मचाऱ्यांना खालीलप्रमाणे प्रसुती रजा सक्षम प्राधिकारी स्तरावर मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामध्ये कार्यरत असलेल्या कंत्राटी महिला कर्मचाऱ्यांना अर्ज केल्याच्या तारखेस, दोन किंवा त्याहून अधिक हयात मुले नसतील तर, सक्षम प्राधिकारी रजा सुरु झाल्याच्या तारखेपासून ६० दिवसांच्या कालावधीची प्रसुती रजा मंजूर करु शकेल. अशा कालावधीत, रजेवर जाण्याच्या लगतपुर्वी तिला जेवढे मानधन मिळत असेल तेवढेच रजा मानधन देण्यात येईल. परंतु, संबंधित महिला कर्मचाऱ्यास रजा उपभोगून कामावर रुजू झाल्यानंतर ११ महिन्यांचा कंत्राट कालावधी पूर्ण करणे बंधनकारक राहील. पुढील कंत्राट कालावधीपेक्षा कमी कालावधीत संबंधित महिला कर्मचाऱ्याने राजीनामा दिल्यास अथवा अन्य कोणत्याही मार्गाने सेवा सोडून दिल्यास रजा कालावधीतील मानधन वसुल करण्यात येईल.

सदर परिपत्रकातील तरतुदी या पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर व सुधारणा सहाय्य आणि प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, बेलापूर यामध्ये कार्यरत असलेल्या महिला कर्मचाऱ्यांनाही लागू राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०३२०१५३०४२८९२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2015.03.20 17:10:22 +05'30'

**(अजय सावरीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१३.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१६.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१७.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१८.कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२०.मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये.
२१.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२२.निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.